**शिरगांव कोठे खारभूमी योजना ता. वसई, जि. पालघर या योजनेच्या नुतनीकरणाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाभूयो - २०२१/(प्र.क्र.२१९)/खारभूमी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०४ मार्च, २०२२

**पहावे-** मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोंकण प्रदेश,मुंबई यांचे पत्र क्र. मुअकोप्र / खाभूयो-२०२१ / शिरगांव कोठे / खारभूमी / तां- ३ /३२१४, दिनांक १३/०९/२०२१ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

शिरगांव कोठे खारभूमी योजना, ता. वसई, जि. पालघर ही योजना वसई तालुक्यातील वैतरणा मुख्य खाडीच्या डाव्या तीरावरील उपखाडीवर आहे. शिरगांव कोठे खारभूमी योजना, ता. वसई, जि. पालघर ही योजना पालघर जिल्हातील खारभूमी विकास योजनेच्या बृहत आरखड्यात समाविष्ट आहे.तसेच केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार,नवी दिल्ली यांचे कडील पत्र जा. क्र. जे-१७०११/३२/२००१ /आय - ३/दिनांक २२/८/२००३ अन्वये सागरी नियमन कायदा १९९१ मधून सूट दिलेल्या कोकणातील एकूण ५७५ (जूना ठाणे जिल्हातील १०८ खारभूमी योजना) खारभूमी योजनांमध्ये सदर योजनेचा समावेश आहे.सदरहू योजना बोर्डकालीन असून सन १९९२ मध्ये सदर योजनेचे नुतनीकरणाचे काम पूर्ण झालेले आहे. सदर योजना पूर्ण होऊन २९ वर्षाचा कालावधी लोटला आहे.सदर योजनेमुळे ७१ हेक्टर क्षेत्र पुनःप्रापीत होणार आहे.योजनेच्या बांधाची एकूण लांबी १८१० मीटर आहे, तसेच या योजनेवर सा. क्र. ९० मी.,१०६५ मी. व १४५० मी वर अशा ३ उघाड्या आहेत.

ही योजना खारलॅन्ड बोर्डामार्फत पूर्ण झालेली आहे.योजनेच्या नुतनीकरणाचे काम पूर्वी सन १९९२मध्ये करण्यात आले होते. योजनेचे नुतनीकरण करुन २९ वर्षाचा कालावधी लोटल्यामुळे तसेच वारंवार होणाऱ्या भरतीमुळे खारे पाणी प्रापण क्षेत्रात शिरुन शेत जमिनीचे नुकसान होत असल्याने, बृहत आराखडयात समाविष्ट असलेल्या योजनेचे काम करुन मिळावे, म्हणून या योजनेवरील खारभूमी लाभार्थी शेतकरी यांनी योजनेचे नुतनीकरण करुन मिळावे म्हणुन मागणी केलेली आहे.योजनेचा पुन:प्रापित क्षेत्रानुसार प्रतिहेक्टरी खर्च रु. १,६७,०८९/- इतका येत असून तो सध्याच्या प्रचलित आर्थिक मापदंड रु. १,९२,९५०/- पेक्षा कमी आहे

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला शिरगांव कोठे खारभूमी योजना ता. वसई, जि. पालघर या खारभूमी योजनेच्या नूतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

शिरगांव कोठे खारभूमी योजना, ता. वसई, जि. पालघर या योजनेच्या नूतनीकरणाच्या कामास खारभूमी विभागाच्या सन २०१९-२० या वर्षाच्या दरसूचीवर आधारित अंदाजित रू. १,१८,६३,३४२/- (रुपये एक कोटी, अठरा लक्ष, त्रेसष्ट हजार तीनशे बेचाळीस फक्त) इतक्या रक्कमेस याव्दारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. मुख्य कामाकरिता रु. ९०,६०,७८६/- (रुपये नव्वद लक्ष, साठ हजार, सातशे शहाऐंशी फक्त) , अनुषंगिक कामाकरिता रु. ९,०६,०७९/- (रुपये नऊ लक्ष, सहा हजार, एकोणऐंशी फक्त), GST करीता रु. ४,५३,०३९/- (रुपये चार लक्ष, त्रेपन्न हजार, एकोणचाळीस फक्त) व गौण खनिज करिता रु.१४,४३,४३७/- लक्ष (रुपये चौदा लक्ष, त्रेचाळीस हजार, चारशे सदतीस फक्त) अशी तरतूद असून तरतुदींचा उपशीर्षवार गोषवारा सोबतच्या "परिशिष्टामध्ये" नमूद केला आहे. सदरील प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष “४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत) (४४०२०३८४)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.
२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, दिनांक २२.६.२०१५ मधील परिच्छेद क्र. २(१) व २(२) मधील तरतुदींनुसार खारभूमी योजनेचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी लाभधारकांनी सहकारी संस्था स्थापन करावी व खारभूमी योजना पूर्ण करण्यासाठी पुन:प्रापित क्षेत्रातील लाभधारकांकडून प्रकल्पातील सहभाग म्हणून रुपये ५००/- प्रती हेक्टर खर्च (किमान रुपये २००/- रोख व रुपये ३००/- मजूरीच्या स्वरुपात किंवा रोखीने) घेण्यात यावा. योजनेचे काम पूर्ण झाल्यानंतर योजना देखभाल व दुरुस्तीसाठी त्यांच्याकडे हस्तांतरित करणे आवश्यक राहील.
३) सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पित केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
४) या कामाकरीता पर्यावरण विषयक तसेच इतर सर्व वैधानिक मान्यता घेतल्यानंतरच प्रत्यक्ष काम सुरु करावे.
५) सदर प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वीत करण्याच्या विविध टप्प्यांवर झालेल्या अनियमिततेस मान्यता असल्याचे गृहित धरता येणार नाही. सदर प्रशासकीय मान्यता देण्यापूर्वी अथवा नंतर देखील या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास सदर प्रशासकीय मान्यता प्रदान केल्याने ती नियमीत झालेली आहे, असे गृहीत धरता येणार नाही.
६) या योजनेबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू ठेवावी. सदर प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे सध्या सुरू असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणा-या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहोचणार नाही.
७) सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती इत्यादीची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.
८) सदर प्रकल्पाच्या प्रशासकीय मान्यतेमध्ये अंतर्भूत किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.
९) संपूर्ण प्रकल्प हा सदर प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

सदरहू शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५, भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच नियोजन विभागाच्या (कायार्सन-१४३४) यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१९३/२०२१, दिनांक ११/०२/२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीने आंतरवित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यतेच्या नोंदवहीत २२६ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०४१५२९३९७१२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सहपत्र:**- परिशिष्ट अ

SUSHMA RAJEEV KUDAL

Digitally signed by SUSHMA RAJEEV KUDAL
DN: CN = SUSHMA RAJEEV KUDAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2022.03.04 15:30:56 +05'30'

**( सुषमा कुडल )**
शासनाच्या अवर सचिव

**प्रतिलिपी :-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई
३. मा.उपमुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य ,मंत्रालय , यांचे प्रधान सचिव मुंबई
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.मंत्री (खारजमिनी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.राज्यमंत्री (खारजमिनी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव ( लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
१२. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
१३. मुख्य अभियंता,(दवप्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
१५. आंतर वित्त सल्लागार व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. उपसचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे.
१८. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९. अवर सचिव,अर्थ शाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२०. कक्ष अधिकारी वित्त विभाग/अर्थ-२,मंत्रालय, मुंबई.

२१. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, ( कार्यासन -१४३४), मंत्रालय मुंबई

२२. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्रमांकः खाभूयो २०२१/प्र. क्र.२१९/ खारभूमी

दिनांक : ०४ /०३ /२०२२ चे परिशिष्ट )

परिशिष्ट अ

शिरगांव कोठे खारभूमी योजना ता. वसई, जि. पालघर या योजनेच्या नुतनीकरणाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतच्या प्रस्तावातील उपशीर्षनिहाय तरतुदी

| अ.क्र. | उपशीर्ष | अंदाजपत्रकीय किंमत (रूपये ) |
|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक कामे | ०.०० |
| २ | ब- भूमी संपादन | ०.०० |
| ३ | क- कामे बंधारा | ८५,५३,८४६.००- |
| ४ | फ- आर.एच.टी. वर्क | ०.०० |
| ५ | के- इमारती | ०.०० |
| ६ | एम- वृक्षारोपण | ०.०० |
| ७ | ओ- संकीर्ण | ०.०० |
| ८ | पी- देखभाल | ०.०० |
| ९ | आर- दळणवळण | ५,०६,९४०.०० |
| | एकूण कामे रुपये | **९०,६०,७८६.००** |
| | गौण खनिज | १४,४३,४३८.०० |
| | जी. एस. टी. | ४,५३,०३९.०० |
| | अनुषांगिक खर्च १०% | ९,०६,०७९.०० |
| | **एकूण रुपये** | **१,१८,६३,३४२/-** |

**ठळक वैशिष्टये**

| | |
|---|---|
| अ )पुन:प्रापित होणारे क्षेत्र | ७१ हेक्टर |
| ब) प्रती हेक्टरी किंमत (रुपये) | रुपये १,६७,०८९/- |
| क) लाभव्यय गुणोत्तर | २.७३ |

SUSHMA RAJEEV KUDAL

Digitally signed by SUSHMA RAJEEV KUDAL
DN: CN = SUSHMA RAJEEV KUDAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2022.03.04 15:31:11 +05'30'

( सुषमा कुडल )
शासनाच्या अवर सचिव